**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०२१७/प्र.क्र.१९५/पोल-७.**
मंत्रालय, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २० मार्च २०१७.

**विषय** :- सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई येथील जुन्या पोलीस वसाहतीतील इमारतींच्या दुरुस्तीची एकूण **७१** कामे करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**संदर्भ** :-
1. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ./कक्ष-८(१२)/शा.४०१/२०१६, दिनांक २८.१२.२०१६.

**ज्ञापन** :-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई येथील जुन्या पोलीस वसाहतीतील इमारतींच्या दुरुस्तीची एकूण **७१** कामे करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मध्य मुंबई, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.४,०१,८५,१५२ /- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते रु.३,९६,४७,२२६/- असे सुधारित केले आहेत. त्या अनुसार, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई येथील जुन्या पोलीस वसाहतीतील इमारतींच्या दुरुस्तीची, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या संदर्भाधीन पत्रात उल्लेख केलेली, एकूण **७१** कामे करण्यासाठी, **रु.३,९६,४७,२२६/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

1. उक्त खर्चाचे अंदाज अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई, यांनी साक्षांकित करावे.
2. उक्त खर्चाचे अंदाज पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करावे.

४. उक्त कामासाठी येणारा खर्च हा बी-१, मुख्य लेखाशीर्ष, २०५५, पोलीस (०२), शहर पोलीस, शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**५.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०३/इमा-२, दिनांक १६.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२११२३१३२९३२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.21 12:32:08 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मध्य मुंबई, वरळी, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).